**कला संचालनालयाच्या आस्थापनेवर वरिष्ठ लिपिकाचे एक अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. एडीआर - २०१९/प्र.क्र. १३५ /तांशि-६,**
मंत्रालय, विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०९ जानेवारी, २०२०.

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब दिनांक २१ डिसेंबर,२०१९.
२) कला उप संचालक (प्र.शा.) यांचे पत्र क्रमांक डिओओ-२०१९/तीन/२११९ दिनांक २४ डिसेंबर,२०१९.

**प्रस्तावना :-**

मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ या याचिकेमध्ये दिनांक ६ जुलै,२०१७ रोजी दिला आहे. तसेच, मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्रमांक ३१४०/२००८ मध्ये दिनांक २८.०९.२०१८ च्या आदेशान्वये मा.सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१.१२.२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश देण्यात आले आहेत.

०२. मा.न्यायालयांच्या आदेशांची अंमलबजावणी करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २१ डिसेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. त्यानुसार जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या अनुसूचित जमातीच्या अधिकारी कर्मचाऱ्यांची संवर्गनिहाय संख्या निश्चित करून त्यांच्या सेवा दिनांक ३१ डिसेंबर,२०१९ पर्यंत अधिसंख्य पदावर वर्ग करावयाच्या आहेत. तसेच, सदर पदे भरण्यासाठी विशेष भरती मोहिम राबविण्यासाठी कालमर्यादा देखील आखून देण्यात आली आहे.

०३. कला संचालनालयाच्या आस्थापनेवरील श्री.प्र.प्र.राऊत, वरीष्ठ लिपिक यांचे अनुसुचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरले असल्याने त्यांच्या सेवा वर्ग करण्यासाठी अधिसंख्य पद निर्माण करण्याचा प्रस्ताव कला संचालनालयाच्या उपरोक्त दिनांक २४ डिसेंबर, २०१९ च्या पत्रान्वये सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

कला संचालनालयाच्या आस्थापनेवरील श्री.प्र.प्र.राऊत, वरीष्ठ लिपिक यांचे अनुसुचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरले आहे. यास्तव, त्यांच्या सेवा दिनांक ३१ डिसेंबर,२०१९ पासून अधिसंख्य पदावर वर्ग करण्यासाठी, कला संचालनालयाच्या आस्थापनेवर, तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहीले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल

तोपर्यंत, Level: S-८ (२५५००-८११००) या वेतनश्रेणीत एक वरीष्ठ लिपिक हे अधिसंख्य पद निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६०९/अपुक दिनांक २७ डिसेंबर, २०१९ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०९१७२७४४३७०८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2020.01.09 17:07:05 +05'30'

**( सं. रा. उतेकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. सचिव, उच्च व तंत्र शिक्षण, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र ( लेखा व अनुज्ञेयता ) ( लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
५. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हा कोषागार अधिकारी- नागपूर.
८. निवड नस्ती (तांशि ६).